**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट-अ**
**अति. संचालक, आरोग्य सेवा**
**(वेतनश्रेणी रु.३७,४००-६७,००० ग्रेड पे ८७००)**
**या पदावर पदोन्नती देण्याबाबत**

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग,
शासन निर्णय क्र.पदोन्न-११०७/प्र.क्र. ३८३/२०१०/ सेवा-२,
मंत्रालय,मुंबई ४०००३२,
दिनांक : २१ एप्रिल, २०११.

**निर्णय :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट-अ या संवर्गातील डॉ.एस.सी.गुप्ता,सहसंचालक वेतनश्रेणी (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ८९००) यांना महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ संवर्गातील अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (वेतनश्रेणी रु.३७,४००-६७,००० ग्रेड पे ८७००) या संवर्गात तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे.

२. पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सामाजिक बांधिलकी कार्यक्रम) पुणे या पदावर करण्यात येत आहे.

३. त्यांची पदोन्नतीनंतरची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ नुसार करण्यात यावी.

४. त्यांनी त्यांचेकडील सध्याचा कार्यभार त्यांचे कार्यालयातील कनिष्ठ अधिकाऱ्याकडे सोपवून तात्काळ कार्यमुक्त व्हावे व नवीन पदस्थापनेवर त्वरित हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य तसेच शासनास सादर करावा.

५. सदर पदोन्नती मा. उच्च न्यायालयात, प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४च्या अंतीम निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

६. सदर पदस्थापनेचे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने व मान्यतेने निर्गमित करण्यात यावे.
७. सदरहू परिपत्रक शासनाच्या वेबसाईटश्वर उपलब्ध असून त्यांचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०४२२१५२१२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( राजेंद्र पवार)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,
महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
संचालक, आरोग्य सेवा,मुंबई,